**सन २०१८-१९ करिता आशियाई विकास बँक सहाय्यित लहान शेतकऱ्यांना बाजारपेठ उपलब्धता सुधारणा - गरिबी निर्मूलनासाठी जपानचा निधी प्रकल्पासाठी रु. ७१.४० लाख इतका निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बासप्र- ०४१८ /प्र.क्र.७३ /२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०८ जून, २०१८

वाचा :-

१. शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.बासप्र-२००८/ प्र.क्र.४६/२१-स, दि.२९.१०.२०१०
२. प्रकल्प संचालक (JFPR),AIDIP प्रकल्प, पुणे यांचे पत्र क्र.जेएफपीआर/अनुदान/ २०१८-१९/९२७/२०१८, दि.१०.०४.२०१८
३. प्रकल्प संचालक (JFPR),AIDIP प्रकल्प, पुणे यांचे पत्र क्र.जे.एफ.पी.आर./निधी/ २०१८-१९/९२९/२०१८, दि.१०.०४.२०१८
४. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः संकिर्ण-२०१८/ (प्र.क्र.१३/२०१८)/ १७-स, दिनांक ०४ एप्रिल, २०१८.

प्रस्तावना :-

आशियाई विकास बँकेच्या अर्थसहाय्याने राज्यामध्ये कृषि व्यापारविषयक पायाभूत सुविधा विकास गुंतवणूक प्रकल्प (AIDIP) राबविला जात आहे. जेएफपीआर सहाय्यित महाराष्ट्रातील लहान शेतक-यांना बाजारपेठेशी जोडण्याचा प्रकल्प राबविण्यासाठी आशियाई विकास बँकेमार्फत १०० टक्के अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. जेएफपीआर प्रकल्पाच्या अंमलबजावणी करीता कृषि पणन मंडळांतर्गत निधी व्यवस्थापन कक्षाची (Grant Implementation Unit) निर्मिती करण्यात आलेली आहे. आशियाई विकास बँक सहाय्यित गरीबी निर्मूलनासाठी जपानचा निधी (जेएफपीआर) हया प्रकल्पांतर्गत निधी प्राप्त होण्यासाठी आवश्यक ते करार करण्यास शासनाने दि.२९.१०.२०१० रोजीच्या शासन निर्णयानुसार मान्यता दिलेली आहे. संदर्भ क्र. २ येथील प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने जे.एफ.पी.आर. प्रकल्पासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता राज्य हिस्सा रक्कम रू. १.४० लाख व बाह्य हिस्सा रक्कम रू.७०.०० लाख अशी एकूण रू. ७१.४० लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ करीता आशियाई विकास बँक सहाय्यित लहान शेतकऱ्यांना बाजारपेठ उपलब्धता सुधारणा - जपान दारिद्रय निवारण निधी प्रकल्पास (JFPR) राज्य हिश्श्याकरीता रु. १.४० लाख व बाहय हिश्श्याकरीता रु.७०.०० लाख असा एकूण रु. ७१.४० लाख (रुपये एकाहत्तर लाख चाळीस हजार फक्त) इतक्या रकमेचा निधी मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च पुढील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करीता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा :-

(रुपये लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | मंजूर निधी |
|---|---|---|
| १ | मागणी क्रमांक - व्ही-२<br>२४३५, इतर कृषिविषयक कार्यक्रम<br>१९९, इतर अशासकीय संस्थांना सहाय्य<br>०१ (बाहय सहाय्यित प्रकल्प)<br>(०१)(०५) (आशियाई विकास बँक सहाय्यित लहान शेतकऱ्यांना बाजारपेठ उपलब्धता सुधारणा - जपान दारिद्र्य निवारण निधी प्रकल्प)<br>**(बाह्य सहाय्यीत प्रकल्प)(राज्य हिस्सा)**(कार्यक्रम)<br>(२४३५ ००५३ ),३२, अंशदाने | १.४०<br>(रुपये एक लाख चाळीस हजार फक्त) |
| २ | २४३५, इतर कृषिविषयक कार्यक्रम<br>१९९, इतर अशासकीय संस्थांना सहाय्य<br>०१( बाहय सहाय्यित प्रकल्प)<br>(०१)(०६) (आशियाई विकास बँक सहाय्यित लहान शेतकऱ्यांना बाजारपेठ उपलब्धता सुधारणा - जपान दारिद्र्य निवारण निधी प्रकल्प<br>**(बाह्य सहाय्यीत प्रकल्प)(बाहय हिस्सा(कार्यक्रम** )<br>(२४३५ ००६२), ३२, अंशदाने | ७०.००<br>(रुपये सत्तर लाख फक्त) |
| | **एकूण** | **७१.४०**<br>**(रुपये एकाहत्तर लाख चाळीस हजार फक्त)** |

३. सदर रु. ७१.४० लाख निधी (अक्षरी रुपये एकाहत्तर लाख चाळीस हजार फक्त) R.T.G.S. सुविधेव्दारे प्रकल्पाच्या बँक खात्यामध्ये जमा करावा. सदर प्रकल्पाच्या बँक खात्याचा तपशील पुढीलप्रमाणे -

बँकेचे नांव : बँक ऑफ महाराष्ट्र, मार्केट यार्ड शाखा, गुलटेकडी, पुणे- ३७.
खात्याचे वर्णन : G I U J F P R
खाते क्रमांक : ६००९३७०४२६२
IFS Code : MAHB ०००११४०

४. सदर निधी वितरणाकरीता **श्री. का.गो. वळवी,उप सचिव,** सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना **नियंत्रण अधिकारी** म्हणून व **श्री. र.गं.बोड्डू, कार्यासन अधिकारी,** सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना **आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरित करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला निधी ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे त्याच कारणासाठी विनियोग करण्याबाबत प्रकल्प संचालक (JFPR) प्रकल्प, पुणे यांनी खात्री करावी तसेच केलेल्या कामाचा तपशिल दरमहा शासनास सादर करावा . यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तत्परतेने सादर करावे.

६. वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमुद करण्यात येत आहेत :

१) वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या शासन परिपत्रकान्वये एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्के मर्यादेत निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.
२) मंजूर निधी रु. १०२.०० लाख.
३) मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% व त्यापेक्षा अधिक निधी खर्च झालेला आहे.
४) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरित करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.
५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्याबाबत दक्षता घेतलेली आहे. जे.एफ.पी.आर. प्रकल्पास मिळणारे अनुदान हे स्थानिक स्वराज्य संस्थेला वितरीत करण्यात येत नसल्यामुळे सदर मुद्दा लागू नाही.
६) वैयक्तिक लाभार्थींचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे, ही बाब लागू नाही.
७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा, ही बाब लागू नाही.
८) खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग, दिनांक ३०.१०.२०१५ च्या शासन आदेशानुसार खरेदी विषयक प्रक्रिया करण्यात येईल.
९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करण्यात येईल.

७. वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील मुद्दा क्रमांक ८ मधील अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. परिशिष्टातील अन्य मुद्दे सदर प्रकरणी लागू होत नाहीत.

८. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं२७१/२०१८ व्यय २ दिनांक ३१/०५/२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०६०८१४५८१८२८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33a892413bd2c105002f2acc67792c5931afb42987d31b0deb6c0181d19c74aa, serialNumber=33432a8e2e81dcab0518d2a6ca4f4f1d3dba7ca3247657527f52bef2a2aa29b2, cn=Jayant Baliram Bhoir
Date: 2018.06.08 15:00:10 +05'30'

**( जयंत भोईर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान सभा / परिषद, विधान भवन, मुंबई
२. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/(कृषि व पणन/वित्त/नियोजन), मंत्रालय, मुंबई
५. प्रकल्प संचालक, गरीबी निर्मूलनासाठी जपानचा निधी प्रकल्प(जेएफपीआर), मार्केट यार्ड, गुलटेकडी, पुणे
६. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर
८. सहसंचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, ५वा मजला, नवीन प्रशासन भवन,मंत्रालयासमोर,मुंबई ३२.
९. निवासी लेखापरिक्षण अधिकारी, मुंबई
१०.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११.वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२. नियोजन विभागा ( का-१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
१३.अवर अधिकारी/कक्ष अधिकारी (१७-स/रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.निवडनस्ती (२१-स)